**महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन)**
**नियम, २००९**
**वेतन पडताळणीसाठी वेतन पडताळणी पथके पुढे चालू ठेवणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
वित्त विभाग
शासन निर्णय, क्रमांक - संकीर्ण २०११/प्र.क्र.१६/सेवा-९
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दि. ७ फेब्रुवारी, २०११

पहा :- शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.संकीर्ण-१००९/प्र.क्र.१६९/सेवा-९, दि.६.११.२००९
**शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.संकीर्ण-१०१०/प्र.क्र.५०/सेवा-९, दि.६.४.२०१०**

## शासन निर्णय

दिनांक १ जानेवारी, २००६ पासून सुधारित वेतनसंरचना विहित केल्याबाबतचे आदेश व सुधारीत वेतनसंरचनेत प्रारंभिक वेतन निश्चित करण्याबाबतचे नियम शासन अधिसूचना, वित्त विभाग, क्रमांक :वेपुर १२०९/प्र.क्र.२७/सेवा-९, दि.२२.४.२००९ अन्वये निर्गमित करण्यात आले आहेत. या सुधारित वेतनसंरचनेमध्ये वेतननिश्चिती करण्यासंदर्भातील मार्गदर्शक सूचना या विभागाच्या शासन परिपत्रक, क्रमांक : वेपुर १२०९/प्र.क्र.६९/सेवा-९, दि.२९.४.२००९ अन्वये प्रस्तूत करण्यात आल्या आहेत. उपरोक्त दि.६.११.२००९ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारीत वेतन) नियम, २००९ अन्वये केलेल्या वेतननिश्चितीची पडताळणी करण्यासाठी वेतन पडताळणी पथकांची निर्मिती व बंद केलेली वेतन पडताळणी पथके पुनर्जिवित करण्यात आली आहेत. सदर पथकांतील पदांना दि.६.४.२०१० च्या शासन निर्णयान्वये दि.१.३.२०१० ते २८.२.२०११ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. तथापि, या पथकांनी करावयाचे वेतन पडताळणीचे काम अद्याप शिल्लक असल्याने या पथकातील पदांना मुदतवाढ देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

२. शासन आता असे आदेश देत आहे की, पुनर्जिवित करण्यात आलेली नाशिक, अमरावती व नवीन निर्मित कोकण विभाग येथील वेतन पडताळणी पथके व त्याकरीता निर्माण करण्यात आलेली खालील पदे दिनांक १.३.२०११ ते ३१.१०.२०११ पर्यंत पुढे चालू ठेवण्यात यावीत.

| अक्र | संवर्ग | पे बँड | ग्रेड पे | कोकण भवन पदसंख्या | नाशिक पदसंख्या | अमरावती पदसंख्या |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | लेखा अधिकारी | ९३००-३४८०० | ४,४०० | १ | १ | १ |
| २ | सहायक अधिक्षक | ९३००-३४८०० | ४,२०० | २ | २ | २ |
| ३ | टिप्पणी सहायक | ५२००-२०२०० | २,४०० | २ | २ | २ |
| ४ | लिपिक-टंकलेखक | ५२००-२०२०० | १,९०० | १ | १ | १ |
| ५ | शिपाई | ४४४०-७४४० | १,३०० | १ | १ | १ |
| | एकूण | | | ७ | ७ | ७ |

(कृमाप)

वेतन पडताळणी पथकातील अधिकारी / कर्मचारी यांच्या वेतन व भत्यावरील खर्च वित्त विभाग, मागणी क्रमांक : जी-५, मुख्यलेखाशीर्ष-२०५४ संचालनालय, लेखा व कोषागारे-९५(०१) संचालनालय, लेखा व कोषागारे (२०५४००३१) या शिर्षातंर्गत मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०११०१२९२०३६०५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(य.द.देशकर)
अवर सचिव, वित्त विभाग

प्रति,

१. महालेखापाल-१ (ले व अ), महाराष्ट्र, मुंबई
२. महालेखापाल-२ (ले व अ), महाराष्ट्र, नागपूर
३. महालेखापाल-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
४. महालेखापाल-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. राज्यपालांचे सचिव
७. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
८. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव
९. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक
१०. सामान्य प्रशासन विभाग (१९-अ)
११. मंत्रालयीन सर्व विभाग
१२. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१३. सर्व उपसंचालक, लेखा व कोषागारे
१४. सर्व वेतन पडताळणी पथके, मुंबई/कोकण भवन/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर
१४. कार्यासन अधिकारी, कोषागारे प्रशासन-१ ते ३ / अर्थसंकल्प-४, वित्त विभाग
१५. निवड नस्ती, सेवा-९, वित्त विभाग.